शैक्षणिक वर्ष २०२०-२१ :
अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयांमध्ये
नवीन विद्याशाखांना मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक एनजीसी २०२०/(१०६/२०)/मशि-४**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०००३२**
**दिनांक: ३१ जुलै, २०२०.**

**संदर्भ:** १) शासन निर्णय क्र. एनजीसी-२०१७/(२०८/१७)/मशि-४, दि. १३.०९.२०१७.
२) सन २०२० चा महाराष्ट्र अध्यादेश क्र. ०९ दिनांक २५.०६.२०२०

**शासन आदेश**

महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०९, संदर्भ क्र.२ येथील दि.२५.०६.२०२० चे अध्यादेश अणि संदर्भ क्र.१ येथील दि.१३.०९.२०१७ च्या शासन निर्णयान्वये विहीत केलेल्या कार्यपद्धतीनुसार राज्यातील अकृषि विद्यापीठांनी शैक्षणिक वर्ष २०२०-२१ साठी नवीन विद्याशाखांचे प्रस्ताव मान्यतेसाठी शासनाकडे सादर केले आहेत. सदर प्रस्तावांची संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये विहीत केलेल्या निकषांनुसार छाननी करण्यात आली. विद्यापीठांच्या शिफारशींच्या अनुषंगाने शासन स्तरावर केलेल्या छाननीनुसार पात्र ठरलेल्या प्रस्तावांना महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०९ (४) (घ) व त्याखालील परंतुकान्वये शासनास प्राप्त अधिकारानुसार अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयात पुढील विवरणात नमूद केल्यानुसार नवीन विद्याशाखांना खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून **कायम विना अनुदान तत्वावर** मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे/महाविद्यालयाचे नाव | प्रस्तावित नवीन विद्याशाखा |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| | **मुंबई विद्यापीठ, मुंबई** | |
| १ | सहयोग प्रतिष्ठानचे सहयोग कॉलेज ऑफ मॅनेजमेंट स्टडीज, ज्ञानमृत विद्यालय, दुर्गादेवी पाडा,अंबरनाथ ५०१ ४२१ -ठाणे .जि (.पू) | बी. एम.एस. (०-६०) |
| २ | आर. पी. एज्यूकेशनल ट्रस्टचे आर. पी.इन्स्टिटयुट ऑफ हॉस्पिटॅलिटी ॲन्ड मॅनेजमेंट, प्लॉट नं ४४, शास्त्री नगर, गणपती मंदीराजवळ, वसई (प),जि. पालघर | बी. ए. (कलीनरी आर्टस) (०-६०) |
| ३ | आय.टी. एम. ट्रस्टचे इन्स्टिटयुट ऑफ हॉटेल मॅनेजमेंट आयटीएम कॅम्पस, २५ आणि २६ इन्स्टिट्युशनल एरिया, सेक्टर-४, खारघर (पू), जि. रायगड - ४१० २१० | बी. ए. (कलीनरी आर्टस्) (०-६०) |

| | | |
|---|---|---|
| ४ | जयवंती बाबू फाउंडेशनचे मेट्रोपॉलिटीशन इन्स्टिटयुट ऑफ टेक्नॉलॉजीसुखळवाढ, सिंधुदूर्ग रेल्वे स्टेशन जवळ, पो. ओरस, ता मालवण, जि. सिंधुदूर्ग | बी. एस्सी (कॉम्प्युटर सायन्स) (०-६०)<br>बी. एस्सी (इन्फोरमेशन टेक्नॉलॉजी) (०-६०) |
| ५ | नवनिर्माण शिक्षण संस्थेचे लक्ष्मीबाई सिताराम हळबे कला, विज्ञान आणि वाणिज्य महाविद्यालय पो. कसई, ता. दोडामार्ग,जि.सिंधुदूर्ग- ४१६ ५१२ | बी. एस्सी (हॉस्पिटॅलिटी स्टडीज) (०-६०) |
| ६ | ओशिवरा लेबर मेमोरियल चॅरिटेबल ट्रस्टचे के. एच.एम. डब्ल्यु कॉलेज ऑफ कॉमर्स बी.कॉम/ बी.एम.एम., रिलीफ रोड, ओशिवरा, जोगेश्वरी (प), मुंबई - ४०० १०२. | बी.एस्सी (IT) |
| **राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर** | | |
| ७ | प्रिन्सिपल अरुणराव कलोडे महाविद्यालय, नागपुर | १) विज्ञान व तंत्रज्ञान-बॅचलर ऑफ सायंस-[रसायन शास्त्र] [भौतिक शास्त्र] [प्राणीशास्त्र] [वनस्पती शास्त्र] [गणित] [संगणक विज्ञान ] [इंग्रजी] [मराठी] -(माध्यम-[इंग्रजी]) |
| **सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे** | | |
| ८ | कुकडी एज्युकेशन सोसायटी, सावित्रीबाई कला महाविद्यालय, पत्ता-पिंपळगाव पिसा, ता.श्रीगोंदा, जि. अहमदनगर, पिनकोड-४१३७०३ | **वाणिज्य व व्यवस्थापन**-बी.कॉम<br>**विज्ञान व तंत्रज्ञान**-बी.एस्सी. |
| ९ | मराठा विद्या प्रसारक समाज, कला व वाणिज्य महाविद्यालय, ताहराबाद, पत्ता-ताहाराबाद, ता.बागलाण,जि. नाशिक पिन-४२३३०२ | **विज्ञान व तंत्रज्ञान**-बी.एस्सी. |
| १० | भैरवनाथ शिक्षण मंडळ, भैरवनाथ विज्ञान महाविद्यालय, खुटबाव, ता.दौंड, जि.पुणे | **वाणिज्य व व्यवस्थापन**-बी.कॉम<br>**मानवविज्ञान**-बी.ए. |
| ११ | समर्थ रुरल एज्युकेशनल इन्स्टिट्युट समर्थ कॉलेज ऑफ कॉम्प्युटर सायन्स, पत्ता-बांगरवाडी, ता.जुन्नर जि.पुणे, पिन-४१२४१० | **वाणिज्य व व्यवस्थापन**-बी.कॉम |
| १२ | पुणे विद्यार्थीगृह विज्ञान महाविद्यालय,पत्ता-४४ विद्यानगरी, शिवदर्शन, पर्वती, ता.पुणे (महानगरपालिका हद्द), जि.पुणे पिनकोड-४११००९ | **वाणिज्य व व्यवस्थापन**-बी.कॉम |
| **एस.एन.डी.टी.विद्यापीठ, मुंबई** | | |
| १३ | श्री.गुरुदत्त बहुउद्देशिय संस्था के.जी.वाघ महिला महाविद्यालय, कळंब, पत्ता-दत्त रोड, ता.कळंब, जि.यवतमाळ | बी.एस्सी-सी.एल.एस |

| | | |
|---|---|---|
| १४ | शिवम महिला शिक्षण प्रसारक मंडळ, कॉलेज ऑफ होम सायन्स, काबाडी मोहिल्ला, उडशील मठ समोर, जालना-४६०२०३, जि.जालना | बी.एस्सी. |
| १५ | शिवम महिला शिक्षण प्रसारक मंडळ, कॉलेज ऑफ होम सायन्स, काबाडी मोहिल्ला, उडशील मठ समोर, जालना-४६०२०३, जि.जालना | बी.एम.एस. |
| १६ | देवगिरी प्रतिष्ठान, तुलसी कॉलेज ऑफ फॅशन डिझाइन, संत ज्ञानेश्वर नगर, गव्हर्नमेंट आयटीआय जवळ, बीड-४३११२२, जि.बीड | बी.एम.एस. |
| १७ | राजकुंवर बहुउद्देशिय सेवाभावी संस्था, राजकुंवर महिला महाविद्यालय, बनोटी, ता.सोयगांव, जि.औरंगाबाद | बी.ए. व बी.एस्सी |
| १८ | डॉ.बाबासाहेब आंबेडकर प्रतिष्ठान, पुर्णा, संस्कृती महाविद्यालय, संस्कृती नगर, पुर्णा, ता.पुर्णा, जि.परभणी | बी.डिझाईन |
| १९ | राजकुंवर बहुउद्देशिय सेवाभावी संस्था, राजकुंवर महिला महाविद्यालय, बनोटी, ता.सोयगांव, जि.औरंगाबाद | बी.डिझाईन |
| २० | राजकुंवर बहुउद्देशिय सेवाभावी संस्था, राजकुंवर महिला महाविद्यालय, भोकरदरन, ता.भोकरदरन, जि.जालना | बी.डिझाईन |
| २१ | जीवनरेखा प्रतिष्ठान, महिला बी.सी.ए. महाविद्यालय, प्लॉट नं. ई-५१, आयटी पार्क जवळ, एम.आय.डी.सी. लातूर-४१३५३१ जि.लातूर | बी.डिझाईन |
| २२ | शिवम महिला शिक्षण प्रसारक मंडळ संचलित, शिव छत्रपती महाविद्यालय, खरपुडी, जि. जालना याचिका क्र. १२०७९/२०२० | बी.ए. व बी.एस्सी. |
| | **शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर** | |
| २३ | कासेगांव शिक्षण संस्था, आर्टस अँड कॉमर्स कॉलेज, आष्टा, ता.वाळवा, जि.सांगली | बी.एस्सी.-भाग-१ |
| २४ | कासेगांव शिक्षण संस्था, आर्टस अँड कॉमर्स कॉलेज, कासेगांव, ता.वाळवा, जि.सांगली | बी.एस्सी.-भाग-१ |
| २५ | रयत शिक्षण संस्था, सातारा, सौ. मंगलताई रामचंद्र जगताप महिला महाविद्यालय, उंब्रज, ता.कराड, जि.सातारा | बी.कॉम.-भाग-१ |

| | | |
|---|---|---|
| २६ | बाळासाहेब देसाई फाऊंडेशन दौलतनगर, ता.पाटण,जि.सातारा, श्रीमती विजयादेवी देसाई सिनिअर कॉलेज, दौलतनगर, ता.पाटण, जि.सातारा | बी.ए.-भाग-१ |
| **पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सोलापूर विद्यापीठ, सोलापूर** | | |
| २७ | श्री. हनुमान शिक्षण प्रसारक संस्थेचे समीर गांधी महाविद्यालय, सोलापूर | बी.कॉम.- भाग-१ (वाणिज्य) |
| २८ | श्री. हनुमान शिक्षण प्रसारक संस्थेचे समीर गांधी महाविद्यालय, सोलापूर | बी.एस्सी. भाग-१ (विज्ञान व तंत्रज्ञान) |
| **स्वामी रामानंद तीर्थ नांदेड विद्यापीठ, नांदेड** | | |
| २९ | श्री.शिवाजी शिक्षण प्रसारक मंडळ, शिवाजी कॉलेज हिंगोली | बी.कॉम |

२. **अटी व शर्ती :-**

१. अस्तित्वात असलेल्या ज्या महाविद्यालयात नवीन विद्याशाखा मंजूर करण्यात आलेल्या आहेत, त्या महाविद्यालयाने त्यांच्या विभागीय सहसंचालकांकडे ते भविष्यात कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची मागणी करणार नाहीत असे हमीपत्र रु. १००/- च्या नॉन ज्युडीशियल स्टँप पेपरवर सादर करावे.

२. महाविद्यालयाने हमीपत्र सादर केल्याशिवाय किंवा तसे विभागीय सहसंचालकांचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्याशिवाय संबंधित विद्यापीठाने संलग्नतेची प्रक्रिया सुरु करु नये.

३. महाविद्यालयांनी, संबंधित विद्यापीठाने विहित केलेल्या निकषांनुसार व विद्यापीठ अनुदान आयोगाने विहित केलेल्या शैक्षणिक पात्रतेनुसार अध्यापक / कर्मचारी वर्ग नेमणे आवश्यक असून, इतर सर्व आवश्यक पायाभूत सोयी उपलब्ध कराव्यात व त्याची खात्री विभागीय सहसंचालकांनी करावी आणि तद्नंतरच उपरोक्त अट क्र. २ मधील प्रमाणपत्र विद्यापीठास द्यावे.

४. महाविद्यालयाने कोणत्याही परिस्थितीत मंजूर प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त प्रवेश देऊ नयेत.

५. विद्यापीठ अनुदान आयोगाच्या (ॲफिलिएशन ऑफ कॉलेजस बाय युनिव्हर्सिटीज) रेग्युलेशन २००९ मध्ये महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याबाबत विहित निकषांची पूर्तता केल्याशिवाय संबंधित महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याची कार्यवाही विद्यापीठाने करु नये.

६. संबंधित विद्यापीठांनी, वरील विवरणपत्रातील महाविद्यालयांनी प्रकरणपरत्वे नॅक मुल्यांकन/ पुनर्मुल्यांकन करुन घेण्यासाठी पाठपुरावा करावा.

३. विद्यापीठांनी संलग्नीकरण देण्याबाबत आवश्यक असलेली पुढील कार्यवाही करण्यापूर्वी शासन मान्यता आदेशांचे अवलोकन केल्याशिवाय व विभागीय सहसंचालकाचे अट क्रमांक २ मधील प्रमाणपत्र मिळाल्याशिवाय संलग्नता देण्याची प्रक्रिया सुरु करु नये. विद्यापीठांनी संलग्नतेबाबतचा पूर्तता अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे व संबंधित विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण यांना पाठवावा.

४. संबंधित विद्यापीठांनी व विभागीय सहसंचालकांनी मंजूर करण्यात आलेल्या विद्याशाखांचा नियतकालिक आढावा घेऊन सदर विद्याशाखांमध्ये मंजुर विद्यार्थी संख्येच्या ५०% किंवा त्यापेक्षा कमी विद्यार्थी दिसून आल्यास सदर विद्याशाखांची मान्यता रद्द समजून तसे शासन व विद्यापीठाच्या माहितीने विभागीय सहसंचालकांनी आदेश काढावेत. मा. उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठ, नागपूर येथे दाखल झालेल्या याचिका क्रमांक २४४६/२०१३ व २४४८/२०१३ मध्ये उपस्थित केलेल्या बाबी विचारात घेता या अटी संदर्भात आवश्यक ती कार्यवाही करण्याची जबाबदारी सबंधित विद्यापीठ व विभागीय सहसंचालक यांची राहील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७३११२०५०९८१०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dattatray Vasantrao Kharke

Digitally signed by Dattatray Vasantrao Kharke
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=higher & technical education dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d598800beb5ed37ae09d78fff05921827123426ec3977a7476478ce183be979d, cn=Dattatray Vasantrao Kharke
Date: 2020.08.01 19:09:54 +05'30'

**(द.व.खारके)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) कुलसचिव, सर्व अकृषी विद्यापीठे, महाराष्ट्र राज्य.
२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य.
४) संबंधित संस्था, (विद्यापीठामार्फत)
५) निवड नस्ती (मशि-४)